**“शासकीय निवासी व कार्यालयीन इमारतींच्या परिरक्षण व दुरुस्ती अंतर्गत अटळबाबींची देयके अदा करणे" या प्रयोजनांर्थ स्वतंत्र नवीन लेखाशिर्ष निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२४/प्र.क्र.८३/अर्थ-२**
मंत्रालय, (मुख्य इमारत) चौथा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १६ मे, २०२५

**वाचा** :-महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र-II, नागपुर यांच्या कार्यालयाचे
पत्र क्रमांकः क्र.टि.एम./जिआर.III /युओआर-३२/२०२४-२५/०६ दिनांक ०४.०४.२०२५

**प्रस्तावना :-**

सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राज्यातील सर्व शासकीय निवासी व कार्यालयीन इमारतींच्या परिरक्षण व दुरुस्ती करीता निधी अर्थसंकल्पित करण्यात येतो. सदर अर्थसंकल्पित निधीतून शासकीय निवासी व कार्यालयीन इमारतींच्या परिरक्षण व दुरुस्तीची प्रलंबित देयके अदा करण्याव्यतिरिक्त विद्युत देयके, पाणीपट्टी, साफसफाई देयके, इ. अटळबाबींची देयके अदा करण्याकरीता निधीचे वितरण करण्यात येते. शासकीय निवासी व कार्यालयीन इमारतींच्या परिरक्षण व दुरुस्ती अंतर्गत मोठ्या प्रमाणात प्रलंबित देयके असल्याने अटळबाबींची प्रलंबित देयके अदा करण्यास निधी अपुरा पडत असून सदर देयके मोठ्या प्रमाणात प्रलंबित राहत असल्याची बाबत शासनाच्या निदर्शनास आली आहे.

सबब, राज्यातील शासकीय निवासी व अनिवासी इमारतींवरील अटळ बाबींची देयके नियमित अदा करण्यासाठी विशेष तरतुद करणे आवश्यक आहे. सदर प्रयोजनार्थ निधी अर्थसंकल्पीत करण्याकरीता नवीन लेखाशीर्ष निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

१. “राज्यातील शासकीय निवासी व अनिवासी इमारतींवरील अटळ बाबींची देयके अदा करणे” या प्रयोजनांर्थ पुढीलप्रमाणे दोन स्वतंत्र नवीन लेखाशिर्ष निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**२.१ शासकीय निवासी इमारतींचे परिरक्षण व दुरूस्ती-**

| **मागणी क्रमांक एच-३** | | **Demand No H-3** | |
|---|---|---|---|
| २२१६ | गृहनिर्माण | 2216 | Housing |
| ०५ | एकत्रित सर्वसाधारण निवास व्यवस्था-बांधकाम | 05 | General Pool Accommodation - Construction |
| ०५३ | परिरक्षण व दुरुस्ती | 053 | Maintenance and Repairs |
| (०४) | निवासी इमारतींचे परिरक्षण व दुरुस्ती | (04) | Maintenance and Repairs of Residential Buildings |
| (०४)(३०) | अटळ खर्च (अनिवार्य) (२२१६ ३४१९) | (04)(30) | Unavoidable Expenditure (committed) (2216 3419) |
| | २७-लहान बांधकामे | | 27-Minor Works |

**२.२ शासकीय कार्यालयीन इमारतींचे परिरक्षण व दुरूस्ती-**

| **मागणी क्रमांक एच-६** | | **Demand No H-6** | |
|---|---|---|---|
| २०५९ | सार्वजनिक बांधकाम | 2059 | Public Works |
| ०१ | कार्यालयीन इमारती | 01 | Office Buildings |
| ०५३ | परिरक्षण व दुरुस्ती | 053 | Maintenance and Repairs |
| (०३) | कार्यालयीन इमारतींचे परिरक्षण व दुरुस्ती | (03) | Maintenance and Repairs of office Buildings |
| (०३)(३२) | अटळ खर्च (अनिवार्य) (२०५९ ४७६३) | (03)(32) | Unavoidable Expenditure (committed) (2059 4763) |
| | २७-लहान बांधकामे | | 27-Minor Works |

३. सदरचा शासन निर्णय हा महालेखापाल, महाराष्ट्र-II, नागपुर यांचे उक्त वाचा येथील पत्र तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२/अर्थ-१२ दिनांक:-२५/०३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेने व सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२५०५१६१५०१५८०७१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANJIT SHIVAJIRAO AHIRE

Digitally signed by RANJIT SHIVAJIRAO AHIRE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT, 2.5.4.20=1abde6c83c28d6dbd9f52f359ea16d2e960f16f7ca457601da7303357626d5f5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7695265D501491899F1C290C5FAC1C7252F8D5F4D75CE48B86577435F1F4D615, cn=RANJIT SHIVAJIRAO AHIRE
Date: 2025.05.16 15:02:35 +05'30'

**(रणजित अहिरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर.
२. अपर मुख्य सचिव, (वित्त) मंत्रालय, मुंबई
३. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
४. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सार्वजनिक बांधकाम विभाग), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. सचिव, (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सर्व.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सर्व.
१०. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सर्व.
११. अधिदान व लेखाधिकारी,सर्व.
१२. निवासी लेखाधिकारी.सर्व.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सर्व.
१४. वित्त विभाग (व्यय-११/अर्थ-१२), मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (कार्यासन अर्थ-२), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.